रेशीम उद्योगाचा प्रचार व प्रसिद्धी कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ करिता निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक लेखानू-१०२१/प्र.क्र.१०४/रेशीम कक्ष**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक २३ डिसेंबर, २०२१.

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक प्रावियो-१०१८/प्र.क्र.१९/ रेशीम कक्ष, दिनांक १८ एप्रिल, २०१८.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक लेखानू-१०२०/प्र.क्र.४४/ रेशीम कक्ष, दिनांक ०४ ऑगस्ट, २०२१.
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक लेखानू-१०२०/प्र.क्र.४४/ रेशीम कक्ष, दिनांक ०७ डिसेंबर, २०२१.
४) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्रमांक रेशीम/कार्या-८/ॲग्रोव्हिजन प्रदर्शनी/तरतूद/ मागणी/२०२१/१९२९, दिनांक १७ डिसेंबर, २०२१.

प्रस्तावना :-

रेशीम उद्योगाच्या प्रचार व प्रसिद्धी कार्यक्रमासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता ₹१५०.०० लक्ष इतकी अर्थसंकल्पीय तरतूद आहे. सदर तरतूदीपैकी १० टक्के म्हणजेच ₹१५ लक्ष इतक्या निधी वितरणास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यानुसार सन २०१९-२० या वित्तीय वर्षातील प्रलंबित देयके अदा करण्यासाठी संदर्भाधीन दिनांक ०४ ऑगस्ट, २०२१ च्या शासन निर्णयान्वये ₹८,५६,९२०/- व संदर्भाधीन दिनांक ०७ डिसेंबर, २०२१ च्या शासन निर्णयान्वये ₹१,७०,०००/- असा एकूण ₹१०,२६,९२०/- इतका निधी संचालक (रेशीम) यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्यामुळे, वित्त विभागाने मंजूर केलेल्या सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीच्या १० टक्के (₹१५ लक्ष) निधीपैकी वितरीत केलेला ₹१०,२६,९२०/- इतका निधी वजा जाता ₹४,७३,०८०/- इतका निधी विभागाकडे वितरणासाठी उपलब्ध आहे. आता, दिनांक २४ डिसेंबर, २०२१ ते २७ डिसेंबर, २०२१ या कालावधीत नागपूर येथे आयोजित ॲग्रोव्हिजन कृषी प्रदर्शनी-२०२१ मध्ये रेशीम संचालनालयाचा स्टॉल लावण्यासाठी ₹२,०९,९२०/- इतका निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती संचालक (रेशीम) यांनी संदर्भाधीन दिनांक १७ डिसेंबर, २०२१ च्या पत्रान्वये केली आहे. सबब, ॲग्रोव्हिजन प्रदर्शनी-२०२१ मध्ये रेशीम संचालनालयाचा स्टॉल लावण्यासाठी येणारा खर्च भागविण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

रेशीम उद्योगाच्या प्रचार व प्रसिद्धी कार्यक्रमांतर्गत दिनांक २४ डिसेंबर, २०२१ ते २७ डिसेंबर, २०२१ या कालावधीत नागपूर येथे आयोजित ॲग्रोव्हिजन कृषी प्रदर्शनी-२०२१ मध्ये रेशीम संचालनालयाचा स्टॉल लावण्यासाठी ₹२,०९,९२०/- (अक्षरी रुपये दोन लक्ष नऊ हजार नऊशे वीस फक्त) इतका निधी वितरीत व खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. कोरोना विषाणूचा प्रादुर्भाव टाळण्यासाठी शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचना व नियमांचे पालन करावे.

३ सदर निधी खर्च करताना वित्तीय नियम व वित्त विभागाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटी व शर्तींचे पालन करावे. सदर निधीचे विनियोग प्रमाणपत्र महालेखापाल व शासनास विहित मुदतीत सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. उक्त निधी कोषागारातून आहरण व संवितरण करण्यासाठी लेखाधिकारी, रेशीम संचालनालय, नागपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच, संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांना नियंत्रण अधिकारी (V003) म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. उक्त निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर संचालक (रेशीम) यांच्या अधिनस्त सुपूर्द करण्यात येत आहे.

५ उक्त खर्च हा "मागणी क्र.व्ही-२, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, ००, १०७, रेशीम उद्योग, (०१) विविध सहकारी संस्थांना सहाय्य, (०१)(०१) राज्याचे वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ अंतर्गत रेशीम उद्योगाचा प्रचार व प्रसिद्धी (कार्यक्रम) (२८५१६५७४), २६, जाहिरात व प्रसिद्धी" अंतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३४४/२०२१/व्यय-२, दिनांक ०९.०७.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२२३१५४८३२९७०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KISHOR DAULAT PATIL

Digitally signed by KISHOR DAULAT PATIL
DN: CN = KISHOR DAULAT PATIL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT
Date: 2021.12.23 15:51:33 +05'30'

**(कि.दौ. पाटील)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३) सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) कोषागार अधिकारी, नागपूर.
७) सहायक संचालक, प्रादेशिक रेशीम कार्यालय, नागपूर.
८) निवड नस्ती (रेशीम कक्ष).